# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**सिंदफणा नदीवरील टाकळगाव (ता.गेवराई, जि.बीड) को.प. बंधाऱ्याचे उच्च पातळी बंधाऱ्यात रुपांतर करणेबाबत**

(१) **३४९१९ (२३-११-२०१७). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील** : सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिंदफणा नदीवरील टाकळगाव (ता.गेवराई, जि.बीड) को.प. बंधाऱ्याचे उच्च पातळी बंधाऱ्यात रुपांतर करण्याची मागणी माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.जलसंपदा मंत्री यांनी कामाचे अंदाजपत्रक सादर करण्याचे निर्देश महामंडळास दिले आहेत, हे ही आहे काय,

(३) असल्यास, गेवराई आणि बीड तालुक्यातील अनेक गावातील पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्मूलनार्थ या कामाची आवश्यकता असल्याची शिफारस जिल्हाधिकारी, बीड यांनी दिनांक १० एप्रिल, २०१७ रोजीच्या पत्राद्वारे महामंडळाकडे केली आहे, हे ही खरे आहे ?

(४) असल्यास, परिसरातील सुमारे २५ हून अधिक गावांच्या टंचाई निर्मूलनार्थ शासन उक्त कामास मंजुरी देण्याबाबत तसेच संबधित विभागाने सादर केलेल्या प्रस्तावावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) होय.
(२) पाणी उपलब्धतेबाबत आवश्यक दृढीकरण करुन टाकळगांव बॅरेजसाठी सविस्तर अन्वेषण, सर्वेक्षण आणि संकल्पन तयार करणेबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.
(३) होय.
(४) टाकळगांव को.प. बंधारा माजलगांव धरणाच्या उर्ध्व बाजूस आहे. माजलगांव धरणाच्या येव्यामध्ये तुट असल्यामुळे त्याच्या उर्ध्व बाजूस नवीन प्रकल्प न घेण्याची शिफारस एकात्मिक गोदावरी जल आराखडयामध्ये केली आहे. त्यामुळे अस्तित्वातील को.प. बंधाऱ्याचे रुपांतरण बॅरेजमध्ये करणे शक्य होणार नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**जायकवाडी धरणातील पाणी वापराचे नियोजन करण्यासाठी धोरण ठरविणेबाबत**

**(२) ३४९२४ (२३-११-२०१७). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जयवंतराव जाधव, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान गोदावरी नदीवरील जायकवाडी धरण १०० टक्के पूर्ण भरले असल्याने लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी मोठ्या प्रमाणावर सिंचनाचे नियोजन केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, धरणाच्या लाभक्षेत्रात मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना, बीड, परभणी सह अनेक जिल्ह्यातील लाखो हेक्टर जमीन ओलीताखाली येत असून धरणातील पाण्याचे योग्य नियोजन झाल्यास उपलब्ध पाणी सुमारे तीन वर्ष पिकांना देता येऊ शकते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपलब्ध पाण्याचा योग्य वापर व्हावा तसेच शेतकऱ्यांनाही सिंचनाची हमी मिळावी याद्दष्टीने शासनाने जायकवाडीच्या पाणी वापराचे नियोजन करण्यासाठी ठोस धोरण ठरविण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास गोदावरी मराठवाडा पाटबंधारे महामंडळ यांचेकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, धरणातील पाणी पुढील दोन वर्ष योग्य पद्धतीने वापरता यावे यासाठी शासनाने ठोस धोरण ठरविले आहे काय, तसेच कालव्यांची वहन क्षमता वाढीबरोबर पाणी गळती थांबवून कालवा सल्लागार समितीच्या नियमित बैठका घेण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) होय खरे आहे.

(२) प्रकल्प अहवालामध्ये पूर्ण उपयुक्त पाणी साठ्याचे नियोजन एक वर्षासाठी करण्याचीच तरतूद आहे. धरणातील उपलब्ध दिनांक १५/१०/२०१७ चे उपयुक्त साठ्यावर आधारित सन २०१७-१८ या वर्षाकरिता सिंचनाचे नियोजन मा.जलसंपदा मंत्री यांचे अध्यक्षतेखाली कालवा सल्लागार समितीचे बैठकीमध्ये दिनांक १३/११/२०१७ रोजी करण्यात आले आहे. सदरील नियोजन एक वर्षाचे कालावधीपुरते आहे.

(३) श्री.अमरसिंह पंडीत, मा.वि.प.स. यांनी पत्र क्र.५३७३ दिनांक २१/१०/२०१७ अन्वये पाणी वापराचे धोरण ठरविणेबाबत मागणी लाभक्षेत्र विकास प्राधिकरण कार्यालय, बीड यांचेकडे करण्यात आली आहे.

(४) धरणातील उपलब्ध पाण्याचे एक वर्षाचे कालावधीसाठी नियोजन करण्यात येते.

---

**बीड जिल्हा शासकीय रुग्णालयाचे विस्तारीकरण करण्याबाबत**

**(३) ३४९२६ (२३-११-२०१७). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जयवंतराव जाधव, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) बीड जिल्हा शासकीय रुग्णालयाचे विस्तारीकरण करण्यासाठी शासनाने गृह विभागाची जागा आरोग्य विभागाला देण्याबाबत माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान मंजुरी दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्हा शासकीय रुग्णालय, बीड येथील दैनिक रुग्णांचे प्रमाण पाहता तेथे ३०० खाटांचे विस्तारित रुग्णालय आवश्यक असून त्यास पूर्वी शासनाने मंजुरी दिली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, लोकप्रतिनिधींनी रुग्णालयास गृह विभागाची जागा हस्तांतरीत करण्याची मागणी दिनांक २६ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास जिल्हाधिकारी, बीड यांचेकडे केली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, शासनाकडून जागा उपलब्ध होण्यास होत असलेल्या विलंबाची कारणे काय आहेत,

(५) तसेच जिल्हा शासकीय रुग्णालय, बीड येथील विस्तारीकरणाचे काम पूर्ण होण्यासाठी व रुग्णालयातील आवश्यक सुविधा व मनुष्यबळ उपलब्ध करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) हे खरे आहे.

(४) जिल्हाधिकारी, बीड यांनी दिनांक ३०/११/२०१७ च्या पत्रान्वये आगाऊ ताबा देणेबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत.

(५) रुग्णालयाच्या विस्तारीकरणासाठी जागेचा ताबा घेण्याची कार्यवाही सुरु असून नवीन इमारतीचे अंदाज आराखडे यांना प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर इमारतीचे बांधकाम हाती घेण्यात येईल व इमारत बांधकाम पूर्ण झाल्यानंतर आवश्यक सुविधा व मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जायकवाडी धरणाच्या कालव्यांची वहन क्षमता वाढविणेबाबत

**(४) ३५००३ (२३-११-२०१७). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गोदावरी नदीवरील जायकवाडी धरण माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान १०० टक्के भरल्यामुळे धरणातील पाणी मोठ्या प्रमाणावर नदी पात्रात सोडावे लागले असून हे पाणी आंध्र प्रदेश आणि तेलंगणा राज्यात वाहून गेले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, धरणाच्या डाव्या आणि उजव्या कालव्याची पाणी वहन क्षमता सुमारे २४०० क्युसेस असतांनाही या कालव्यातून सुमारे ४०० क्युसेस पाणी सोडण्यात आल्यामुळे धरणातील पाण्याचा मोठ्या प्रमाणावर अपव्यय झाला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, जायकवाडी धरणातून माहे सप्टेंबर आणि ऑक्टोबर महिन्यात सुरुवातीस कालव्यातून पाणी सोडण्यात आले, त्यावेळी माजलगाव धरणासह इतर धरणात अत्यल्प पाणी साठा होता, परंतु केवळ कालव्यांची वहन क्षमता कमी झाल्यामुळे कालव्यातून मुळ क्षमतेने पाणी सोडता आले नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, जायकवाडी धरणाच्या कालव्यांची विशेषतः उजव्या कालव्यांची वहन क्षमता वाढवून पाण्याची गळती थांबविण्यासाठी उपाययोजना करण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी महामंडळाकडे दिनांक २३ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली, हे ही खरे आहे काय,

(५) तसेच जायकवाडी धरणाच्या कालव्यांच्या दुरुस्तीसाठी आणि त्यावरील सिंचन क्षेत्र वाढविण्यासाठी सी.एस.आर. मधून निधी उभारण्याची घोषणा माहे सप्टेंबरमध्ये मा.जलसंपदा मंत्री यांनी केल्यानंतर यामधून उक्त प्रकरणी किती निधी प्राप्त झाला असून कालव्यांच्या दुरुस्तीसाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) होय.

(२) हे खरे नाही.

पुर परिस्थितीमध्ये सांडव्याव्दारे नदीपात्रात पाणी सोडणे आवश्यक असल्याने पाण्याचा अपव्यय झाला असे म्हणणे संयुक्तीक नाही. तथापी जिल्हाधिकारी, परभणी यांचे मागणीनुसार पैठण डावा कालव्याद्वारे १००० क्युसेक्स विसर्गाने पाणी सोडण्यात आले होते. तसेच पैठण उजवा कलव्याची संकल्पीत वहन क्षमता शिर्ष (कालवा मुखाशी) भागासाठी २२५० क्युसेक्स आहे. प्रत्यक्ष क्षेत्रिय परिस्थिती लक्षात घेता पैठण उजवा कालव्याव्दारे दिनांक ०३/०९/२०१७ ते २४/१०/२०१७ या कालावधीत ५३.३८ दलघमी ऐवढे पाणी जास्तीत जास्त ७०० क्युसेक्स नियंत्रित विसर्गाने माजलगांव धरणात सोडण्यात आले आहे.

(३) जायकवाडी जलाशयातून फक्त माजलगाव धरण जलाशयातच पैठण उजव्या कालव्याव्दारे पाणी सोडता येते. पैठण उजव्या कालव्याची वहनक्षमता कमी असल्याने सप्टेंबर व ऑक्टोबर महिन्यात माजलगाव धरणासाठी ७०० क्युसेक्स विसर्गाने पाणी सोडण्यात आले आहे. तसेच जिल्हाधिकारी, परभणी यांचे मागणीनुसार पैठण डाव्या कालव्यातुन १००० क्युसेक्स विसर्गाने पाणी सोडण्यात आले आहे. दिनांक ०३/०९/२०१७ रोजी माजलगांव धरणात एकूण पाणीसाठा २१३.५० दलघमी. पैकी उपयुक्त पाणीसाठा ७१.५० दलघमी. होता (२२.९२%) दलघमी एवढा पाणीसाठा होता. दिनांक २४/१०/२०१७ रोजी माजलगाव धरणामध्ये १०० टक्के पाणीसाठा झालेला आहे.

(४) श्री.अमरसिंह पंडीत वि.प.स. यांनी त्यांचे पत्र क्र. ५३६५ दिनांक २६/०९/२०१७ अन्वये वहन क्षमता वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याची मागणी केलेली आहे.

(५) सी.एस.आर. मधुन निधी प्राप्त नाही. सध्या कालवा व वितरण व्यवस्थेच्या दुरुस्तीबाबत तातडीने उपाययोजना म्हणुन यांत्रिकी संघटनेकडील उपलब्ध यंत्र सामुग्रीद्वारे कामे करण्यात येत आहेत. निधी उपलब्धतेनुसार दुरुस्तीची कामे हाती घेण्याचे नियोजन आहे.

---

## यवतमाळ जिल्हा परिषदेमध्ये निधी अखर्चित असल्याबाबत

**(५) ३५०२२ (२३-११-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हा परिषदेमध्ये नियोजन शुन्य कारभारामुळे सन २०१५-१६ यावर्षात समाजकल्याण, सार्वजनिक बांधकाम, कृषी, पशुसंवर्धन, महिला व बालकल्याण व सार्वजनिक आरोग्य विभागांसाठी उपलब्ध करण्यात आलेला निधी अखर्चित राहिल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) व (३) सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात उपलब्ध झालेला निधी वर्षाच्या अखेरीस प्राप्त झाल्याने अखर्चित राहिला.

तथापि, वित्त विभागाच्या दिनांक ०६/०६/२००८ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सदर निधी पुढील सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये खर्च करण्यात आला असून उर्वरीत अखर्चित निधी शासन खाती भरणा करण्याची कार्यवाही प्राथम्याने सुरु आहे.

---

## यवतमाळ जिल्हयातील गावांमध्ये स्मशान भूमी नसल्याबाबत

**(६) ३५०३१ (२३-११-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हयातील एक हजार गावांमध्ये स्मशान भूमी नसल्याने मृतदेहाचे अंत्यसंस्कार उघडयावरच करावे लागतात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त गावांमध्ये स्मशानभूमीच्या बांधकामासाठी शासनाने दिलेले रुपये १३ लाख इतके अनुदान ग्रामपंचायत भवनासाठी वापरण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने दोषींवर काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) अंशतः खरे आहे.
(२) नाही. यवतमाळ जिल्ह्यात २३२ गावांना ग्रामपंचायत भवन नसल्याबाबतचे पंचायत समिती स्तरावरुन प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार जिल्हा नियोजन समितीने दिनांक २२/०७/२०१७ रोजी ११२ ग्रामपंचायत भवन बांधकामास मंजूरी प्रदान केली आहे. सदर बांधकामाकरीता सन २०१६-१७ चे शिल्लक अनुदान रुपये ६.०० कोटी व सन २०१७-१८ चे रुपये ७.०० कोटी असे एकूण १३.०० कोटी मंजूर रकमेपैकी १०.९० कोटी रुपये प्राप्त झाले असून ग्रामपंचायतींना वितरीत करण्यात आले आहेत.
(३) सदर ग्रामपंचायत भवनासाठी मंजूर करण्यात आलेले अनुदान त्याच कामावर खर्च करण्यात येत असल्यामुळे याबाबत चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गंगापूर (जि नाशिक) धरणाजवळील मेगा पर्यटन संकुलातील जागतिक दर्जाच्या बोट क्लबची इमारतीबाबत तसेच गोवर्धन (जि.नाशिक) येथील कलाग्रामच्या अपूर्ण कामाबाबत

**(७) ३५०९४ (२३-११-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गंगापूर (जि.नाशिक) धरणाजवळील मेगा पर्यटन संकुलातील जागतिक दर्जाच्या बोट क्लबची इमारत पूर्ण झाल्यामुळे सदर बोट क्लब कार्यान्वित करण्याबाबत दिनांक २६ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनास निवेदन दिलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर पर्यटन संकुलातील ग्रेप पार्क रिसॉर्ट, साहसी क्रीडा संकुल कामांना निधी उपलब्ध असूनही ही कामे अपूर्ण आहेत तसेच कन्व्हेंशन सेंटर उभारण्याबाबतचे कामासाठी महाराष्ट्र विकास पर्यटन महामंडळाने राज्य शासनास निधी मिळणेकरिता सादर केलेल्या विचाराधीन प्रस्तावावर शासनाचा विचार पुर्ण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या या कामासाठी राज्य शासनाने निधी उपलब्ध करून दिला आहे काय, तसेच प्रस्तुत कामाची सद्य:स्थिती काय आहे,

(४) तसेच गोवर्धन (ता.जि.नाशिक) येथील कलाग्रामचे अपूर्ण काम पूर्ण करण्यासाठी राज्य शासनाने एकरकमी पुरेसा निधी उपलब्ध करून देण्याची स्थानिक लोकप्रतिनिधींनी माहे जून, २०१७ मध्ये शासनाकडे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(५) असल्यास, प्रश्न भाग (४) मधील इमारत विनावापर पडून राहू नये म्हणून इमारत पूर्ण होण्याआधी दिल्ली हाटच्या धर्तीवर विविध राज्यांशी टाय-अप करुन येथे लोककला विक्री प्रदर्शन सुरु करण्यासाठी कलाग्रामचे एक्झेक्युशन प्लॅन तयार करावा, अशी मागणी लोकप्रतिनिधींनी दिनांक १२ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, उक्त प्रकरणी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (११-१२-२०१७) :** (१) होय.

(२) सदर पर्यटन संकुलातील ग्रेप पार्क व साहसी पार्क क्रीडा संकुल येथील कामे प्रगतीपथावर असून अंतिम टप्प्यात आहेत.

ग्रेप पार्क येथील मुख्य इमारत,स्वागत कक्ष, भंडारगृह, उपहारगृह प्रतिक्षागृह व २८ कक्ष ट्वीन व्हील इत्यादी स्थापत्य ही कामे पूर्ण झालेली आहेत.

तसेच साहसी क्रीडा संकुलातील मंजूर निविदेनुसार वेगवेगळ्या घटकांची/ इमारतीची स्थापत्य कामे पूर्ण झाली आहेत.

नाशिक कन्व्हेंशन सेंटरकरिता निधी मिळण्याबाबतचा सुधारित प्रस्ताव महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने नुकताच सादर केला असून त्याबाबत निधीच्या उपलब्धतेनुसार निर्णय घेण्यात येईल.

(३) कन्व्हेंशन सेंटर बांधकामासाठी शासनाने रूपये ५००.०० लक्ष निधी उपलब्ध करून दिलेला आहे.

(४), (५) व (६) अशी मागणी प्राप्त झालेली आढळून येत नाही. तथापि, सदर प्रकल्पाचा पीपीपी तत्वावर विकास करण्यासाठी सल्लागाराची नेमणूक करणे व त्यातूनच खाजगी उद्योजकांकडून आर्थिक देकार व गुंतवणूक प्राप्त करणे यासाठीच्या करारनाम्यातील अटी व शर्तींचा प्रारूप मसुदा तयार करण्यात आला असून त्याबाबतची निविदा कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

---

## सेनगांव (जि.हिंगोली) तालुक्यात शेततळ्याची कामे करण्याबाबत

**(८) ३५१२१ (२३-११-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सेनगांव (जि.हिंगोली) तालुक्यात मागील २ वर्षापासून कृषी विभागातर्फे शेततळ्याचे एकही काम करण्यात आले नसल्याने सिंचनाची क्षमता वाढू शकली नाही, हे खरे आहे काय,

(२) तसेच कृषी विभागातर्फे शेततळयाचे एकही काम न करण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने शेततळ्याची कामे करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०६-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

सेनगांव तालुक्यामध्ये मागेल त्याला शेततळे अंतर्गत ३४५ शेततळ्याची कामे पुर्ण झाली असुन ४० कामे प्रगती पथावर आहेत.

(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कलगाव (ता.जि.हिंगोली) येथील लाभार्थ्यांना इंदिरा आवास योजनेंतर्गत मिळालेल्या घरकुलाचा धनादेश मिळाल्याबाबत

**(९) ३५१२३ (१६-११-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कलगाव (ता.जि.हिंगोली) येथील ३० लाभार्थ्यांना सन २०१२-१३ मध्ये इंदिरा आवास योजनेंतर्गत मिळालेल्या घरकुलाचा अद्याप धनादेशच मिळाला नसल्याने लाभार्थी चार वर्षापासून पंचायत समिती, हिंगोली व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे वारंवार विचारणा करीत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०६-१२-२०१७) :** (१) नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहर-उपनगरातील शासकीय आणि महापालिकेच्या रक्तपेढयांमधील रक्त वाया गेल्याबाबत

**(१०) ३५१४९ (२३-११-२०१७). श्री.रामराव वडकुते, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार, श्री.रामनिवास सिंह, श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील शहर व उपनगरातील ३४ शासकीय व महापालिकेच्या रक्तपेढ्यांमधील १ हजार ९२ युनिट्स रक्त माहे जानेवारी ते जून, २०१७ या कालावधीत मुदत संपल्याने वाया गेल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नियोजनाअभावी, अपुरे व्यवस्थापन, रक्तपेढ्यांमध्ये क्षमतेपेक्षा अधिक रक्ताची साठवणूक करण्याची क्षमता असूनही केवळ रक्त पेढ्यांमध्ये योग्य संवाद नसणे या कारणांमुळे रक्त वाया गेले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने शासकीय व पालिका रक्तपेढ्यांमध्ये साठवलेल्या रक्ताचे योग्य ते नियोजन करण्यासाठी कोणती कार्यवाही व उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

मुंबई शहर-उपनगरामध्ये शासकीय/ महापालिकेच्या १७ रक्तपेढ्या कार्यरत आहेत व एकूण रक्त संकलन ६०,७९० युनिट आहे. कालबाह्यतेमुळे त्यापैकी एकूण १०९२ युनिट एवढे रक्ताचे निर्लेखन करण्यात आले. सदरचे निर्लेखीत रक्त संशोधनाकरीता उपयोगात आणण्यात येते.

(२) हे खरे नाही.

रक्तपेढ्यांमध्ये योग्य नियोजन आहे. सर्व रक्तगटांचे रक्त आपत्कालीन स्थितीसाठी उपलब्ध ठेवावे लागते. रक्तपिशव्यांची आवश्यक मागणी विहीत कालावधीत प्राप्त न झाल्यामुळे मुदतबाह्य रक्तपिशव्यांचे निर्लेखन करण्यात येत आहे. परंतु सदरचे निर्लेखीत रक्त संशोधनाकरिता उपयोगात आणण्यात येते.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

तथापि, राष्ट्रीय रक्त संक्रमण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे एका रक्तपेढीतील अतिरिक्त रक्त दुसऱ्या रक्त पेढीत गरजेनुसार स्थलांतरीत करण्याच्या सूचना सर्व रक्तपेढ्यांना देण्यात आलेल्या आहेत.

---

## औरंगाबाद शहरात स्टोन क्रशर विनापरवाना डोंगर पोखरत असल्याबाबत

**(११) ३५२५७ (२३-११-२०१७). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद शहरात मोठ्या प्रमाणात खदानी असून काही स्टोन क्रशर विनापरवाना डोंगर पोखरत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी विभागीय आयुक्त यांनी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांना चौकशी करण्याचे आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, विनापरवाना डोंगर पोखरणाऱ्या स्टोन क्रशर यांची शासनाने चौकशी करुन दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-१२-२०१७) :** (१), (२) व (३) जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांच्याकडून औरंगाबाद शहरालगत दगड खाणी व क्रशर तपासणीसाठी ऑक्टोबर, २०१७ मध्ये स्वतंत्र पथकामार्फत करण्यात आली असून, या प्रकरणी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी देखील चौकशीचे निदेश दिले आहेत. जिल्हाधिकारी यांनी नेमलेल्या स्वतंत्र पथकाच्या तपासणीमध्ये आढळलेल्या अवैध खदानधारकांना आणि गौणखनिजापोटी स्वामित्वधन भरणा न केलेल्या स्टोनक्रशर धारकांना नोटीसा बजावण्यात आल्या आहेत. सदर खदानधारकांच्या आणि क्रशरधारकांच्या अभिलेखाची तपासणी करुन दंड निश्चितीची कार्यवाही जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांचेमार्फत करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जव्हार (जि.पालघर) कुटीर रुग्णालय येथे राबविण्यात आलेल्या राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमामध्ये कुष्ठरुग्ण आढळल्याबाबत

**(१२) ३५३५२ (२३-११-२०१७). श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जव्हार (जि.पालघर) कुटीर रुग्णालय येथे राबविण्यात आलेल्या राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमामध्ये १२८ संशयित कुष्ठरुग्ण दिनांक १४ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास आढळले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, चौकशीच्या अनुषंगाने कुष्ठरोग या साथीच्या आजारावर आळा घालण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०८-१२-२०१७) :** (१) हे खरे आहे.

जव्हार कुटीर रुग्णालय (जि.पालघर) नगरपालिका कार्यक्षेत्रात दिनांक ६ ते २१ सप्टेंबर, २०१७ या कालावधीत राबविण्यात आलेल्या कुष्ठरोग शोध अभियानांतर्गत १८५ संशयित रुग्ण आढळून आले. वैद्यकीय अधिकारी यांचेकडून या संशयितांची तपासणी केली असता १ रुग्णांस कुष्ठरोग झाल्याचे आढळून आले. त्याला बहुविध औषधोपचार सुरु करण्यात आलेला आहे.

(२) आढळलेल्या संशयित रुग्णांमधून निदान झालेल्या १ असांसर्गिक रुग्णाची पडताळणी सहसंचालक कार्यालयातील पथकामार्फत करण्यात आलेली आहे.

राज्यातील जास्त कुष्ठरुग्णभार असलेल्या जिल्हयांमध्ये (दर दहा हजारी ०.८ पेक्षा जास्त कुष्ठरुग्णभार) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार वरील विशेष मोहिम राबविण्यात आली होती. समाजात लपून राहिलेले कुष्ठरुग्ण शोधून त्यांच्यावर उपचार सुरु करणे व संसर्गाची साखळी खंडीत करणे हा मोहिमेचा उद्देश आहे. कुष्ठरोग हा साथीचा आजार नाही.

त्यामुळे शासनाने चौकशी करण्याचा प्रश्न येत नाही.

१. शहरी भागात अवैस यांचेमार्फत जोखमीच्या भागात सर्वेक्षण करुन संशयित रुग्ण शोधून वैद्यकीय अधिकारी यांच्या निदान निश्चिती नंतर त्यांना बहुविध औषधोपचार दिला जातो.
२. ग्रामीण भागात आरोग्य कर्मचारी व आशा यांच्यामार्फत संशयित रुग्ण शोधून वैद्यकीय अधिकारी यांच्या निदान निश्चितीनंतर त्यांना बहुविध औषधोपचार दिला जातो.
३. नविन शोधलेल्या सर्व कुष्ठरुग्णाच्या सहवासिताची तपासणी केली जाते.
४. सांसर्गिक रुग्ण व मुले आढळलेल्या ठिकाणी ग्रामीण भागात संपूर्ण गावाचा व शहरी भागात आजूबाजूच्या ३०० घरातील लोकांची तपासणी केली जाते.
५. रायगड जिल्हयातील १५ संदर्भ सेवा केंद्रामार्फत कुष्ठरुग्णांना आवश्यक ते नुसार विकृती प्रतिबंध व वैद्यकीय पुनर्वसन सेवा दिल्या जातात.
६. कार्यक्षेत्रात विविध आरोग्य शिक्षण व जनजागृतीचे कार्यक्रम करुन समाजात कुष्ठरोगाविषयी जनजागृती केली जाते.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील सर्व मेडिकल कॉलेजमध्ये "हेल्थ इन्फॉर्मेशन मॅनेजमेंट सिस्टीम" राबवून रुग्णांची सुसूत्रता व पारदर्शकपणा आणण्याबाबत

**(१३) ३५७३८ (२३-११-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व मेडिकल कॉलेजमध्ये "हेल्थ इन्फॉर्मेशन मॅनेजमेंट सिस्टीम" (एचआयएमएस) राबवून रुग्णांची सुसूत्रता व पारदर्शकपणा आणण्याचे काम शासनाने योजले होते परंतु ११ वर्षाचा कालावधी उलटूनही हे काम अद्यापपावेतो पूर्ण झालेले नसल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान उघडकीस आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील अजूनही १४ मेडिकल कॉलेजमध्ये ही प्रणाली १०० टक्के कार्यान्वित झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या कामांकरिता आतापर्यंत जवळपास ३४ कोटी रुपये खर्च झालेला असतांनाही ही प्रणाली पूर्णक्षमतेने कार्यान्वित न होण्याची कारणे काय आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

(३) सद्य:स्थितीत १२ शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये सदर प्रणालीचा वापर करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात वर्षभरात २८ हजार ९५२ जणांना एच.आय.व्ही.ची लागण झाल्याबाबत

**(१४) ३५७३९ (१७-११-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार, श्री.रामनिवास सिंह, श्री.प्रविण दरेकर, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.प्रकाश गजभिये, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वर्षभरात एकुण २८ हजार ९५२ जणांना एड्सची (एच.आय.व्ही.) लागण झाली असल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच राज्यात दरवर्षी १२ ते १३ लाख रक्तपिशव्यांची आवश्यकता असून दरवर्षी रक्त संकलन आणि शिबिरातील नियोजनाच्या अभावामुळे मुदत उलटल्याने हजारो युनिट रक्त वाया जाते, हे ही खरे आहे काय,

(३) मुंबईत मागील तीन वर्षात दूषित रक्तामुळे, लाल रक्त पेशी प्लेटलेट्स,प्लाज्मा या रक्त घटकांच्या संक्रमणातून ७८ जणांना एड्सची (एच.आय.व्ही.) बाधा झाल्याचे एड्स नियंत्रण सोसायटीने जाहीर केलेल्या आकडेवारीनुसार दिसून आले असून सध्या तपासणीसाठी सरकारी रक्तपेढ्यांमध्ये एलायझा या पद्धतीचा अवलंब होत असल्याने हे प्रमाण वाढल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, मुंबईत अनेक खाजगी रक्तपेढ्यांमध्ये नॅट पद्धतीची तपासणी केली जात असल्यामुळे एचआयव्हीचे निदान पहिल्या दहा दिवसात होते, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, राज्यातील एड्स (एच.आय.व्ही.) आणि गुप्तरोगाच्या रुग्णांवर उपचार करण्याबरोबरच त्यांना अन्य सेवा पुरविण्यासाठी राज्याच्या एड्स नियंत्रण संस्थेला केंद्र शासनाने गेल्या तीन वर्षात निधी न दिल्यामुळे एड्स (एच.आय.व्ही.) रुग्णांवर उपचार करणे कठीण झाले आहे, सदर संस्थेच्या कर्मचाऱ्याचे वेतनही देण्यात आलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, रक्त घटकांच्या संक्रमणातून एड्स (एच.आय.व्ही.) ची बाधा थांबविण्यासाठी, शासकीय रक्तपेढ्यांमध्ये अद्ययावत तपासणी पद्धती अवलंबविण्यासाठी, एड्स नियंत्रण संस्थेला निधी देण्याबाबत व तेथील कर्मचाऱ्यांना वेतन देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

महाराष्ट्र राज्यात सन २०१६-१७ मध्ये एकुण २८,०३,२९४ सामान्य व्यक्तिंची एच.आय.व्ही. तपासणी करण्यात आली असून त्यापैकी २८,९५५ जणांना एच.आय.व्ही. ची लागण झाल्याचे निदर्शनास आलेले आहे.

(२) होय, हे अंशत: खरे आहे.

आपत्कालीन परिस्थितीमध्ये गरजू रुग्णांचे प्राण वाचविण्यासाठी कमीत कमी १०% रक्तसाठा आरक्षित ठेवणे गरजेचे आहे. साठविलेल्या रक्ताचे आयुर्मान ३५ ते ४२ दिवस असते. या कालावधीनंतर साठविलेले रक्त कालबाहय ठरविण्यात येते.

सन २०१६ मध्ये महाराष्ट्र राज्यामध्ये १६.१७ लाख युनिट एवढे रक्त संकलन झाले. त्यापैकी गरजेनुसार १४.६७ लाख एवढे युनिट रक्ताचा वापर करण्यात आला व उर्वरित शिल्लक राहिलेले १९,१२७ एवढे यूनिट रक्त कालबाहय ठरल्याने ते वाया गेले. त्याचे प्रमाण १.१८% आहे.

(३) हे खरे नाही.

मुंबईतील एकात्मिक सल्ला व चाचणी केंद्रामध्ये निदान झालेल्या एच.आय.व्ही. बाधित रुग्णांनी समुपदेशना दरम्यान सांगितलेल्या संभाव्य संक्रमण मार्गांच्या माहितीनुसार, गेल्या तीन वर्षात ७८ जणांनी रक्त/रक्त घटक चढवले गेल्याबद्दल सांगितले. परंतु यासंबंधी कोणताही निश्चित पुरावा नसल्याने खात्रीलायक अनुमान काढता येत नाही. सध्या एच.आय.व्ही संक्रमण तपासणीसाठी सरकारी व महानगरपालिका रक्त पेढयांमध्ये एलायझा या पध्दतीचा अवलंब होत आहे. गेल्या काही वर्षातील ऐच्छिक रक्तदान मोहिमांमुळे रक्त पेढयांतील एच.आय.व्ही. बाधित रक्ताचे प्रमाण लक्षणीयरित्या कमी असून एलायझा या पध्दतीचा अवलंब केल्याने एड्स रुग्णांच्या संख्येत वाढ झालेली नाही.

(४) होय हे खरे आहे.

मुंबईतील खाजगी रक्तपेढयांमध्ये नॅट पद्धतीचा वापर केल्यामुळे एच.आय.व्ही. चे निदान हे दहा दिवसांपेक्षा कमी कालावधीत होते.

(५) हे खरे नाही.

वार्षिक कृती आराखडयाप्रमाणे केंद्र सरकारकडून निधी प्राप्त होत असतो आणि तो महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेंतर्गत कार्यरत कर्मचाऱ्यांच्या वेतनावर तसेच अन्य सेवा पुरविणाऱ्या संस्थांवर खर्च होत आहे.

(६) राज्य रक्त संक्रमण परिषदेमार्फत राज्य शासनास न्युक्लिईक ॲसिड टेस्ट (नॅट) केंद्र उभारण्याचा प्रस्ताव सादर करण्यात आलेला आहे.

---

## सडक/अर्जूनी (जि.गोंदिया) तालुक्यातील प्राथमिक आरोग्य केंद्राची कामे निकृष्ट दर्जाची झाल्याबाबत

**(१५) ३५९०५ (२३-११-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सडक/अर्जूनी (जि.गोंदिया) तालुक्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रात फ्लोरिंग व टाईल्सचे बांधकाम निकृष्ट दर्जाचे केल्याने याबाबत चौकशी करण्याची मागणी ग्रामस्थांनी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी स्थानिक नागरीकांनी जिल्हाधिकारी, गोंदिया यांच्याकडे तसेच संबंधितांकडे अनेक वेळा तक्रार करुनही कोणतीच कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून निकृष्ट दर्जाचे बांधकाम करणाऱ्या संबंधित दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) उक्त प्रकरणी जिल्हाधिकारी कार्यालयाकडून आरोग्य विभाग जिल्हा परिषद आणि बांधकाम विभाग जिल्हा परिषद यांना माहे ऑक्टोबर, २०१७ या कालावधीत कोणताही पत्रव्यवहार झालेला नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील अंगणवाड्यांमध्ये बालकांना कोरडा पाकिट बंद आहार देण्याच्या निर्णयाबाबत**

**(१६) ३५९२९ (२३-११-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अंगणवाड्यांमध्ये बालकांना दिला जाणारा गरम ताजा आहार बंद करुन तयार कोरडा पाकिट बंद आहार देण्याचा निर्णय केंद्र शासनाने घेतला असल्याचे दिनांक २२ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ही योजना मोठया कॉर्पोरेट कंपन्याना सोपविण्याचे काम केंद्र शासन पर्यायाने शासन करणार असून या निर्णयामुळे अंगणवाडयामध्ये काम करणाऱ्या २६ लाख महिलांच्या रोजगारावर परिणाम होणार असल्याने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०५-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

राज्य शासनाने दिनांक १७ जुलै, २०१७ रोजी ३ ते ६ वयोगटातील लाभार्थ्यांना प्रीमीक्स फुडचा पुरवठा करणेसाठी निविदा प्रकाशित केली आहे. प्रीमीक्स फुड हा आहार अंगणवाडीत शिजविण्यात येणार आहे व गरम स्वरुपात लाभार्थ्यांना खाण्यास देण्यात येणार आहे. सदर निविदेसंदर्भात मा.उच्च न्यायालयात ४ रिट याचिका दाखल झालेल्या आहेत. अंतिम पुरवठा आदेश देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने स्थगिती दिली असल्यामुळे अद्याप पुरवठा आदेश देण्यात आलेले नाहीत. न्यायालयाच्या निर्णयाप्रमाणे पुढील कार्यवाही करणेबाबत कळविण्यात येईल.

(२) शासनाने निविदा ही मोठया कॉर्पोरेट कंपन्यासाठी काढलेली नसून मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे महिला मंडळ/ महिला संस्था/ महिला बचतगट यांचेसाठीच काढलेली आहे.

(३) लागु नाही.

## नागपूर शासकीय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेडीकल) येथील यंत्र बंद असल्याबाबत

**(१७) ३५९३३ (२३-११-२०१७). श्री.परिणय फुके, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर शासकीय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेडीकल) येथील आठ व्हेटिलेटर्स, चार एक्स-रे मशीन, शस्त्रक्रिया गृहातील वातानुकूलीत यंत्र, तसेच सुपर स्पेशालीटी रुग्णालय येथील इको यंत्र इ. यंत्रे बंद असल्याचे दिनांक ३ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर यंत्रे बंद असल्यामुळे गरीब रूग्णांना बाहेरून उपचार करावे लागत असल्याने त्यांचे आर्थिक नुकसान होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने उक्त यंत्रे त्वरीत दुरुस्त करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## तांबे-बांबळेवाडी (ता.जुन्नर, जि.पुणे) रस्त्याची दुरवस्था झाल्याबाबत

**(१८) ३५९५५ (२३-११-२०१७). श्री.परिणय फुके, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.हरिसिंग राठोड, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३३३०९ ला दिनांक ११ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) तांबे ते बांबळेवाडी (ता.जुन्नर, जि.पुणे) रस्ता अत्यंत अरूंद व दुरवस्थेत असल्यामुळे स्थानिकांची गैरसोय होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तांबे ते बांबळेवाडी हा रस्ता सुधारणा करणे कामाचे रक्कम रूपये १६.०० लक्षचे अंदाजपत्रक तयार करून एकात्मिक आदिवासी विकास विभाग प्रकल्प घोडेगाव यांच्याकडे जिल्हा परिषदेमार्फत मंजूरीसाठी पाठविण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार तांबे ते बांबळेवाडी हा रस्ता सुधारणेकामी पाठविलेल्या अंदाजपत्रकास मंजूरी देवून रस्त्याची सुधारणा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०८-१२-२०१७) :** (१) अंशत खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) प्रश्नांकित तांबे ते बांबळेवाडी ग्रामीण मार्ग क्र. ५५ असून या रस्त्याची लांबी २.०० कि.मी. आहे. त्यापैकी ०/०० ते १/४०० कि.मी. रस्ता डांबरी पृष्ठभागाचा असून वाहतुकीस योग्य आहे. त्यापुढील १/४०० ते २/०० कि.मी. लांबीचा रस्ता हा माती मुरमाचा गाडीवाट असून अरुंद आहे. या लांबीतील रस्ता सुधारण्याचे अंदाजपत्रक तयार करुन एकात्मिक आदिवासी विकास विभाग प्रकल्प घोडेगाव यांना मार्च, २०१७ मध्ये जिल्हा परिषदेमार्फत पाठविण्यात आले आहे. त्यास अद्याप मंजूरी प्राप्त झालेली नाही.

तथापि, सदर रस्त्याच्या सुधारणा करण्याच्या कामास जिल्हा नियोजन समिती-आदिवासी उपयोजनेंतर्गत रुपये २०.०० लक्ष किंमतीस प्रशासकीय मंजूरी प्राप्त असून काम निविदा स्तरावर आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील केमिस्ट दुकानात काम करीत असलेल्या बोगस फार्मासिस्टवर कारवाई करण्याबाबत

**(१९) ३५९६९ (१८-११-२०१७). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात केमिस्ट दुकानांमध्ये फार्मासिस्ट म्हणून काम करणारे फार्मासिस्ट बाहेरच्या राज्यातून बोगस फार्मासिस्ट प्रमाणपत्र घेऊन त्याची फार्मसी कौन्सिलकडे बेकायदा नोंदणी करुन रुग्णांची फसवणूक करित असल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार बेकायदा नोंदणी करुन रुग्णांची फसवणूक करणाऱ्या बोगस फार्मासिस्टवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०६-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उदभवत नाही.
(३) प्रश्न उदभवत नाही.

---

## मुंबईसह राज्यात क्षयरोग नियंत्रणासाठी काम करणाऱ्या कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत

**(२०) ३५९८२ (२३-११-२०१७). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईसह राज्यात सन १९९८ पासून क्षयरोग नियंत्रणासाठी काम करणाऱ्या कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत मागणी करणारी नस्ती प्रशासनाकडून गहाळ झाली असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यासोबतच या कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासन सेवेत सामावून घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०७-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत नियुक्त केलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासन सेवेत कायम करणे शक्य नसल्याबाबत घेतलेल्या निर्णयाची मुळ नस्ती शासनाकडे उपलब्ध आहे. तथापि सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत कंत्राटी कर्मचाऱ्यांना कायम करण्याबाबत मॅग्मो संघटनेने केलेल्या मागणीच्या अनुषंगाने शासनाच्या अवलोकनार्थ सादर केलेली नस्ती आढळून येत नाही.

(२) नस्तीचा शोध घेतला असता नस्ती आढळून आली नाही.

क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत नियुक्त केलेले कंत्राटी कर्मचारी हे केंद्र शासनाच्या राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या मार्गदर्शक सूचनानुसार करार तत्वावर नियुक्त केलेले निव्वळ कंत्राटी कर्मचारी आहेत. राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत नियुक्त कंत्राटी कर्मचाऱ्यांना नियमित स्वरुपात सामावून घेण्याकरिता शासन निर्णय दिनांक ०५ जून, २०१७ अन्वये आयुक्त सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे अध्यक्षतेखाली अभ्यास समिती गठीत करण्यात आलेली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय वितरित करण्यासंदर्भात गैरव्यवहार होत असल्याबाबत

**(२१) ३५९८८ (२३-११-२०१७). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय वितरीत करण्यासंदर्भात शासकीय अधिकारी व अशासकीय संस्था यांच्या संगनमताने गैरव्यवहार होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामुळे राज्यभरात सहा महिन्यांमध्ये एकसमान धोरण निश्चित करा असा आदेश मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेला दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने एकसमान धोरण निश्चित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही,

परंतु मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेला दिलेल्या आदेशात सर्व साधारणतः अशासकीय संस्थांवर अधिक सक्षम वित्तीय नियंत्रण राहण्याच्या दृष्टिकोनातून सध्या उपलब्ध असलेल्या नियंत्रणात्मक उपाययोजना व्यतिरिक्त आणखी ठोस नियंत्रण धोरण तयार करुन सहा महिन्याच्या आत (दिनांक ३ मार्च, २०१८ पर्यंत) सादर करण्यास आदेशित केलेले आहे.
(३) उक्त प्रकरणी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थे अंतर्गत सद्य:स्थितीत उपलब्ध असलेल्या वित्तीय नियंत्रण धोरणामध्ये काही ठोस बदल करुन अशासकीय संस्थांना देण्यात येणाऱ्या अनुदानाबाबत एकसमान धोरण निश्चित करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक जिल्हयात राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमांतर्गत वाहन सेवा पुरविण्याच्या कंत्राटात अनियमितता झाल्याबाबत

**(२२) ३६१६६ (२७-११-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३१२८८ ला दिनांक ४ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक जिल्हयातील राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमांतर्गत कंत्राटी वाहन सेवा पुरविण्याच्या कंत्राटात अनियमितता झाल्याचे तक्रारीचे अनुषंगाने उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक यांच्यास्तरावरून सदर तक्रारीबाबत सखोल चौकशी करून स्वयंस्पष्ट अभिप्राय देण्याबाबत कळविण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) हे खरे आहे.

नाशिक येथील आरबीएसके अंतर्गत कंत्राटी वाहन सेवा अनियमिततेबाबत चौकशी करण्याचे पत्र उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, नाशिक यांना दिनांक २०/०७/२०१७ आणि दिनांक २४/११/२०१७ रोजी देण्यात आलेले आहे.

(२) उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळ नाशिक यांचेकडील चौकशी अहवालाबाबतच्या दिनांक २८/११/२०१७ च्या पत्रान्वये आरबीएसके अंतर्गत देण्यात आलेल्या वाहनसेवा कंत्राटात कोणत्याही प्रकारचे अनियमितता न झाल्याचे स्पष्ट करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

## तापी नदीवरील उकई धरणातून पाणीवापर योजनेच्या पूर्वसंभाव्यता अहवालाबाबत

**(२३) ३६१६९ (२७-११-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३२०७५ ला दिनांक ४ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उकई धरणातून ५ अ.घ.फु.पाणी वापराच्या योजनेचा पुर्वसंभाव्यता अहवाल (Pre-feasibility report) तयार करण्याची क्षेत्रियस्तरावर प्रगतीत असलेली कार्यवाही पुर्ण झाली आहे काय;

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(३) नसल्यास, सदरील कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) पूर्व व्यवहार्यता अहवालाची तांत्रिक छाननी क्षेत्रियस्तरावर प्रगतीपथावर आहे.

---

## शेतकऱ्यांना मागेल त्याला शेततळे या योजनेच्या खर्चात जीएसटीमुळे वाढ होत असल्याबाबत

**(२४) ३६२३४ (२३-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र शासनामार्फत वेगवेगळ्या आकाराची शेततळी करण्यासाठी आकारमानानुसार वेगवेगळे म्हणजेच जास्तीत जास्त रूपये ५० हजार प्रति शेततळे अनुदान देण्यात येते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याच अनुदानित शेततळ्यात प्लास्टिक कागद (जिओमेम्ब्रन शीट) बसविण्यासाठी २८ टक्के जी.एस.टी. (वस्तु व सेवा कर) आकारण्यात येत असल्याने कागदाची किंमत रूपये ५६ हजार इतकी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, खोदकामाच्या निम्मे पैसेच अनुदान मिळत असल्याने प्लास्टिक कागद हा महाग असल्याने “मागेल त्याला शेततळे” ही योजना खोटी ठरली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास,पुर्वी प्लास्टिक कागदावर आकारला जाणारा १२.५ टक्केच कर आकारला जावा अशी शेतकऱ्यांची मागणी आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्याअनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०८-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) हे खरे नाही. “मागेल त्याला शेततळे” या योजनेंतर्गत केवळ शेततळे तयार करण्यासाठी कमाल रुपये ५०,०००/- इतक्या मर्यादेत अनुदान उपलब्ध दिले जाते. प्लॅस्टिक कागदाचा समावेश या योजनेत करण्यात आलेला नाही. तथापि शेतकऱ्यांना कृषी विभागाच्या इतर योजनांमधून प्लॅस्टिक कागदाचा लाभ अनुज्ञेय आहे. सद्य:स्थितीत या योजनेंतर्गत १,९९,३१६ इतके अर्ज प्राप्त झाले आहेत. त्यापैकी १,४१,१९८ इतक्या कामांना कार्यारंभ आदेश देण्यात आले आहेत.

त्यानुसार ५६,०९५ इतकी शेततळयांची कामे पूर्ण झालेली असून, ४,८५७ इतकी कामे प्रगतीपथावर आहेत. या योजनेंतर्गत आतापर्यंत रुपये २४१.१५ कोटी इतके अनुदान लाभार्थ्यांना वितरीत करण्यात आले आहे.
(४) व (५) होय, हे खरे आहे. या बाबतची मागणी कृषी विभागाकडे क्षेत्रिय स्तरावरुन करण्यात आलेली आहे.

---

## जलसंपदा प्रकल्पांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देताना मोठ्या प्रमाणात तफावत आढळून आल्याबाबत

**(२५) ३६२७७ (२३-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विडी लघु पाटबंधारे (ता.दोडामार्ग, जि.सिंधुदुर्ग) योजनेस १४५ कोटी ९९ लाख रुपयांची सुधारित प्रशासकीय मान्यता माहे ऑक्टोबर, २०१७ वा त्यादरम्यान देण्यात आली असून या प्रकल्पाची मुळ प्रशासकीय मान्यता रुपये ४३ कोटी ४९ लाख एवढी होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गेल्या ३ वर्षामध्ये राज्यामधील एकूण किती लघु पाटबंधारे, मध्यम पाटबंधारे व मोठे पाटबंधारे प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिलेली आहे,
(३) असल्यास, मुळ प्रशासकीय मान्यता व सुधारित प्रशासकीय मान्यता यामध्ये मोठी तफावत आढळून आली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, असे प्रकल्प कोणते, मुळ प्रशासकीय मान्यता व सुधारीत प्रशासकीय मान्यता यात तफावत असण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) होय.
(२) गेल्या ३ वर्षामध्ये राज्यातील ६ मोठे, १८ मध्यम व १६५ लघु प्रकल्प अशा एकूण १८९ प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.
(३) सुधारित प्रशसकीय मान्यता ही SLTAC कडून छाननी केली जाते व त्यांचे शिफारशीनंतरच सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाते.

(४) सुधारित प्रशासकीय मान्यता असलेले १८९ प्रकल्प आहेत. त्याची वाढीची सर्वसाधारण कारणे पुढील प्रमाणे आहेत. :-
i) दरसूचीतील फरक, ii) भूसंपादनाच्या किंमतीत वाढ, iii) संकल्पचित्रातील बदल, iv) ज्यादा दराची निविदा स्वीकृती, v) मुळ अंदाजपत्रकात समाविष्ट नसलेल्या बाबी व vi) अनुषंगिक खर्च व भाववाढ.

---

**मुंबई-बडोदा या प्रस्तावित महामार्गाच्या प्रकल्पाकरिता पालघर जिल्ह्यातील गावांच्या जमिनी जबरदस्तीने संपादित करण्यात येत असल्याबाबत**

**(२६) ३६३६८ (२७-११-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.मोहनराव कदम, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई-बडोदा या प्रस्तावित महामार्गाच्या प्रकल्पाकरिता पालघर जिल्ह्यातील २७ गावांच्या जमिनी संपादित करण्यात येणार आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर महामार्ग प्रकल्पाला पर्यावरण विभागाची मान्यता नाही, मोजणी होणारी गावे पेसा अंतर्गत येत असल्याने या क्षेत्राची मोजणी करण्याचे अधिकार नाहीत तसेच इतर परवानग्या व प्रकल्पाविषयाची कोणतीच माहिती ग्रामस्थांना दिलेली नसतांना जमीन मोजणी महसूल विभाग अधिकारी जबरदस्तीने करीत असल्याने शेतकऱ्यांनी जमिनी संपादित करण्यास विरोध दर्शविला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने जबरदस्तीने व जमीनधारकांना कोणतीही कल्पना न देता त्यांच्या सुपीक जमिनी संपादित करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-१२-२०१७) :** (१) हे खरे असल्याचे मुंबई बडोदा प्रस्तावित द्रुतगती मार्गाच्या अंमलबजावणी कक्षाचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पनवेल यांनी कळविले आहे.

(२) व (३) पर्यावरण विभागाकडे “ना हरकत” प्रमाणपत्रासाठी प्रस्ताव सादर केला असून जून, २०१८ पर्यंत प्राप्त होणे अपेक्षित आहे. तसेच आदिवासी क्षेत्रात अंतर्भूत गावांच्या ग्रामसभेदरम्यान प्रकल्पाची सर्व माहिती सदस्यांना देऊन सर्व मुद्दयांवर चर्चा करण्यात आली आहे. काही गावांमध्ये दुसऱ्यांदा विरोधाचा ठराव प्राप्त झाल्यानंतर जिल्हाधिकारी पालघर यांनी पेसा कायदा १९९६ च्या कलम २६(६) अन्वये प्रकल्पाचे महत्व लक्षात घेऊन भूसंपादन प्रक्रिया सुरु ठेवण्याचे आदेश निर्गमित केले आहेत. प्रकल्पासाठी कोणतीही मोजणी जबरदस्तीने करण्यात आलेली नसून स्थानिकांचा विरोधामुळे काही ठिकाणी मोजणीचे कार्यक्रम रद्द करावे लागले असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पनवेल यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## चतारी (ता.पातूर, जि.अकोला) येथे प्रधानमंत्री आवास योजनेत मोठया प्रमाणात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(२७) ३६४४८ (२३-११-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चतारी (ता.पातूर, जि.अकोला) येथे प्रधानमंत्री आवास योजनेत मोठया प्रमाणात गैरव्यवहार झाल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासकिय निधीचा अपहार केल्याने ग्रामस्थांनी दोषींवर कारवाई करण्याबाबत जिल्हाधिकारी कार्यालयासमोर उपोषण करण्याचा इशारा दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने गैरव्यवहार प्रकरणी दोषी आढळून आलेल्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०७-१२-२०१७) :** (१) नाही.

(२) होय.

(३) होय.

तथापि, चौकशीमध्ये कोणतीही अनियमितता व भ्रष्टाचार झाला नसल्याचे निदर्शनास आले असल्याने कारवाई करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमरावती जिल्हा परिषदेमधील रिक्त पदांबाबत

**(२८) ३६४४९ (२३-११-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमरावती जिल्हा परिषदेमध्ये उपमुख्याधिकारी, लेखापरिक्षक, लेखाधिकारी, अभियंता तसेच अकोला, बुलढाणा, वाशिम जिल्हा परिषदांमध्ये बिंदू नामावलीमध्ये मंजूर झालेली पदे रिक्त असल्याचे माहे ऑक्टोबर,२०१७ मध्ये निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त पदे रिक्त असल्यामुळे केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त निधीची कामे प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर पदे रिक्त राहण्यामागची कारणे काय आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने रिक्त पदे तात्काळ भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०७-१२-२०१७) :** (१) जिल्हा परिषदांमधील उपमुख्य कार्यकारी अधिकारी, लेखाधिकारी, अभियंता या संवर्गाची बिंदू नामावली शासनस्तरावर ठेवण्यात येते.

अमरावती जिल्हा परिषदेत ऑक्टोबर, २०१७ मध्ये उपमुख्य कार्यकारी अधिकारी गट-अ ची एकूण ४ पदे मंजूर असून सदरची सर्व पदे भरलेली आहेत. लेखाधिकारी संवर्गाची मंजूर असलेली २ पदे देखील भरलेली आहेत. तसेच अभियंता संवर्गांतर्गत कार्यकारी अभियंता, उपकार्यकारी अभियंता ही पदे

भरलेली असून उपअभियंता यांची एकूण ७ पदे मंजूर असून ५ पदे भरलेली आहेत. कनिष्ठ अभियंत्यांची एकूण ६८ पदे मंजूर असून ६२ पदे भरलेली आहेत.

अकोला जिल्हा परिषदेतील उपमुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गातील ३ पदे मंजूर असून सर्व पदे भरली आहेत. लेखाधिकारीची २ पदे मंजूर असून सदर पदे भरलेली आहेत. कार्यकारी अभियंता यांचे ३ मंजूर पदांपैकी २ पदे रिक्त असून, उप कार्यकारी अभियंता यांतील १ पदे भरलेले असून १ पद रिक्त आहे. उपअभियंता संवर्गातील १४ पैकी १० पदे भरलेली आहेत.

बुलढाणा जिल्ह्यातील उपमुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गाची ४ पैकी ३ पदे भरलेली असून १ पद रिक्त आहे. लेखाधिकारी संवर्गातील सर्व ४ मंजूर पदे भरलेली आहेत. कार्यकारी अभियंता यांचे ३ मंजूर पदांपैकी १ पद रिक्त असून, उपकार्यकारी अभियंता संवर्गाचे मंजूर असलेली २ पदे भरलेले असून उपअभियंता संवर्गातील मंजूर १७ पदांपैकी १२ पदे भरलेली आहेत.

वाशिम जिल्ह्यात उपमुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गातील ४ मंजूर पदांपैकी ३ पदे भरलेली आहेत, लेखाधिकारी संवर्गाची ५ पदे मंजूर असून २ पदे भरलेली आहेत तसेच कार्यकारी अभियंता संवर्गाच्या मंजूर ३ पदांपैकी १ पद रिक्त असून, उपकार्यकारी अभियंता संवर्गाचे मंजूर असलेले १ पद रिक्त आहे. उपअभियंत्यांच्या मंजूर १४ पदांपैकी ९ पदे भरलेली आहेत.

(२) नाही. अमरावती, अकोला, बुलढाणा, वाशिम जिल्हा परिषदेतील सध्या जी पदे रिक्त आहेत त्या पदांचा कार्यभार इतर अधिकारी/ कर्मचाऱ्यांकडे सोपवून प्रभारी अधिकारी/ कर्मचाऱ्यांकडून प्रस्तुत कामे करुन घेतली जातात.

(३) व (४) महाराष्ट्र विकास सेवा वगळून जिल्हा परिषदेतील इतर वर्ग-१ व वर्ग-२ ची पदे संबंधित प्रशासकीय विभागामार्फत निर्माण करण्यात आली असून सदर पदे संबंधित विभागाकडून भरली जातात. जिल्हा परिषदेतील अधिकाऱ्यांची सर्व रिक्त पदे तात्काळ भरण्याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांना वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

तसेच, जिल्हा परिषदेतील “क” संवर्गातील रिक्त पदे शासन स्तरावर सरळसेवेद्वारे व क्षेत्रियस्तरावर पदोन्नतीद्वारे भरण्याबाबत कार्यवाही सुरू आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अकोट जिल्हयातील वाण धरणामधील पाण्याबाबत

**(२९) ३६४५१ (२३-११-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोट जिल्हयातील वाण धरणामधील संपूर्ण पाणीसाठा हा अमृत योजनेंतर्गत अकोला येथे नेऊन हे पाणी आरक्षित करण्याच्या मार्गावर असल्याने या योजनेला या भागातील शेतकऱ्यांनी विरोध दर्शविला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामध्ये पाटबंधारे बांधण्यासाठी शेतकऱ्यांची ७५० हेक्टर जमीन गेली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वाडी अदमपूर, इसपूर, दहिगाव व इतर गावे लाभार्थी क्षेत्रात येत असून या गावांना पाणी मिळत नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१२-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

अकोला जिल्हयातील वान प्रकल्पाचा उपयुक्त पाणीसाठा ८१.९५ द.ल.घ.मी. असून २४ द.ल.घ.मी. पाणीसाठा अकोला महानगरपालिकेकरिता अमृत योजनेंतर्गत आरक्षित करण्याची मागणी असून यास शेतकऱ्यांनी विरोध दर्शविला आहे.

(२) होय.

कालवे वितरण प्रणालीचे बांधकामाकरिता ९१६ हेक्टर जमीन संपादित केली गेली आहे.

(३) हे खरे नाही.

अकोला जिल्हयातील तेल्हारा तालुक्यातील वाडी अदमपुर, इसापुर व इतर-४० गांवे ही वान प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात येतात. या गांवाना धरणात सिंचनासाठी उपलब्ध असलेले पाणी सिंचनाकरिता मिळते. तथापि, तेल्हारा तालुक्यातील दहिगांव हे गांव वान प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात येत नसल्यामुळे या गावाला वान प्रकल्पाचे पाणी सिंचनाकरिता देण्यात येत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अकोला परिवहन विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(३०) ३६४५२ (२२-११-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला परिवहन विभागात उपप्रादेशिक परिवहन अधिकारी, सहा प्रादेशिक परिवहन अधिकारी, मोटार वाहन निरीक्षक, सहा मोटार वाहन निरीक्षक, मुख्य लिपिक ग्रामीण, मुख्य रोखपाल, कनिष्ठ लेखापरिक्षक, लेखापाल ग्रामीण, वरिष्ठ लिपीक, लिपीक टंकलेखक, सहा रोखपाल, मोटार वाहन चालक, शिपाई/ परिवहन हवालदार, रात्र पहारेकरी, सफाई कामगार, वाहन तपासणीस कंत्राटी, आदिची एकूण ३० पदे रिक्त असल्याचे माहे ऑक्टोंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (११-१२-२०१७) :** (१) एकूण ७० मंजूर पदांपैकी ३० पदे रिक्त आहेत.

(२) सहाय्यक मोटार वाहन निरीक्षकाची ८३३ पदे भरण्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत जाहिरात प्रसिद्ध करुन परीक्षा घेण्यात आली आहे. तसेच पदोन्नतीने भरावयाच्या पदांबाबत कार्यवाही सुरु असून त्यापैकी प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील पदोन्नत्या दिलेल्या आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## थळ ग्रामपंचायत (ता.अलिबाग, जि.रायगड) यांनी कामांमध्ये केलेला गैरव्यवहार

**(३१) ३६५८२ (२७-११-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) थळ ग्रामपंचायत (ता.अलिबाग, जि.रायगड) यांनी सन २०१६-१७ मध्ये आर.सी.एफ. थळ कंपनी, अलिबाग व जिल्हा परिषद रायगड यांच्याकडे रस्त्यांच्या कामाची मागणी केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लोणेरे अंतर्गत रस्ता तयार करणे आदी कामे आर.सी.एफ. कंपनीने थळकडून सी.एस.आर. फंडातून केली असून तीच कामे जिल्हा परिषद रायगडच्या सेस फंडातून केली आहे व तीच कामे ग्रामपंचायतीच्या फंडातून देखील केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, एकाच कामावर तीन संस्थांकडून थळ ग्रामपंचायतने कामापोटी रक्कम घेवून लाखो रूपयांचा गैरव्यवहार केला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या कामातील गैरव्यवहाराची चौकशी करण्यासाठी शासन थळ ग्रामपंचायतीचे विशेष लेखा परिक्षण करुन विशेष लेखा परिक्षण अहवालातील चौकशीमध्ये दोषी आढळल्यास ग्रामविकास विभागाकडील परिपत्रक क्रमांक व्ही.व्ही.पी.एम.-२०१६ प्र.क्र.२५३/.पंरा.-३, दिनांक ४ जानेवारी, २०१७ नुसार शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) अंशत खरे आहे.

ग्रामपंचायत थळ (ता.अलिबाग, जि.रायगड) यांनी आर.सी.एफ थळ कंपनीकडे दिनांक ०५/१२/२०१७ च्या अहवालानुसार थळ ग्रामपंचायत हद्दीतील रस्त्याच्या कामाची मागणी केली होती. जिल्हा परिषदेकडे मागणी केलेली नाही.

(२) होय.

सदर रस्त्याचे काम सन २०१६-१७ मध्ये जिल्हा परिषदेच्या सेस फंडातून दिनांक १६/०५/२०१७ रोजी पूर्ण झालेले असून पुन्हा दिनांक ०६/०६/२०१७ रोजी सी.एस.आर. फंडातून त्याच रस्त्यावर काम केल्याचा अहवाल आर.सी.एफ. कंपनीने दिला आहे. त्यामुळे याबाबत चौकशीचे आदेश देण्यात आलेले आहेत. ग्रामपंचायत फंडातून खर्च करण्यात आलेला नाही.

(३) कार्यकारी अभियंता, जि.प. बांधकाम यांनी दिनांक १६/०५/२०१७ रोजी सदर रस्त्याचे काम पूर्ण केलेले आहे. तथापि, त्याच रस्त्यावर आर.सी.एफ. कंपनीने जिल्हा परिषदेचे ना-हरकत प्रमाणपत्र न घेता, सी.एस.आर. फंडातून खर्च केल्याचा अहवाल दिलेला आहे. याबाबत चौकशीचे आदेश देण्यात आलेले आहेत.

(४) सदर रस्त्यावर जिल्हा परिषदेने दुरुस्तीचे काम केलेले असताना पुन्हा एक महिन्यात आर.सी.एफ. कंपनीने त्याच रस्त्यावर काम केल्याचा अहवाल दिलेला आहे. त्यामुळे सदर प्रकरणाची चौकशी करुन कारवाई करण्याबाबत विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांना निर्देश देण्यात आलेले आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**अंगणवाडी, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना सेवाज्येष्ठतेनुसार मानधन देण्याबाबत**

**(३२) ३६५८३ (२७-११-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अंगणवाडी, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना सेवा ज्येष्ठतेनुसार दिनांक १ ऑक्टोबर, २०१७ पासून मानधन वाढवून देण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दिनांक १ ऑक्टोबर, २०१७ पासून सेवाज्येष्ठनेनुसार मानधन वाढवून देण्याबाबत शासन निर्णय निर्गमित झाला आहे काय, असल्यास, केव्हा, नसल्यास, शासन निर्णयाची अमंलबाजावणी केव्हा करण्यात येईल,
(३) तसेच २५ दिवसांच्या संपामध्ये अंगणवाडी सेविकांनी पोषण आहारासाठी प्रत्येक मुलामागे मिळणारे रूपये पाच वेळेवर मिळत नसून इतर मागण्यांबाबत शासनाने कोणता निर्णय घेतला आहे,
(४) नसल्यास, उक्त मागण्यांबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०४-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) शासन निर्णय निर्गमित करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) मानधनवाढ व्यतिरिक्त भाऊबीज भेट रक्कमेमध्ये वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जव्हार (जि.पालघर) येथील जिल्हा प्रशासनाकडून रोजगार हमी योजनेची कामे उपलब्ध होत नसल्याबाबत

**(३३) ३६७४१ (२३-११-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक ३०६०१ ला दिनांक ६ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रोजगार हमी योजना कायद्यानुसार मागेल त्याला काम देणे बंधनकारक असतांना जव्हार (जि. पालघर) येथील जिल्हा प्रशासनाकडून रोजगार हमी योजना व इतर योजनेतून कामगारांना कामे उपलब्ध होत नसल्यामुळे जव्हार तालुक्यातील हजारो आदिवासी कुटुंबांचे शहरी भागात स्थलांतर होत असल्याने रोजगार हमी योजनेची कामे सुरू करण्याबाबत समर्थन या संस्थेने मा.मंत्री रोजगार हमी योजना, सचिव, रोजगार हमी योजना व जिल्हाधिकारी, पालघर यांच्याकडे दिनांक २६ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास पत्राद्वारे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निवेदनाच्या अनुषंगाने ग्रामीण भागात रोजगार हमी योजनेची कामे सुरू करण्याबाबत तसेच कामाची मागणी करूनही रोजगार हमी योजनेची कामे न मिळाल्याने बेरोजगार मजूरांना बेरोजगार भत्ता मिळण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (११-१२-२०१७) :** (१) नाही.

सदर निवेदन मोखाडा (जि.पालघर) येथील मजुरांना कामे उपलब्ध करुन देण्याबाबत आहे.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोलापूर जिल्हयातील नाझरे प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे रिक्त असल्याबाबत

**(३४) ३६७७५ (२३-११-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर जिल्हयातील नाझरे प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये नाझरे, सरगरवाडी चोपडी, वझरे बंडगरवाडी बलवडी, चिणके, मेलमार मंगवाडी अजनाळे, लिगोडवाडी वाटंबरे अनकढाळ, राजुरी कारंडेवाडी उदनवाडी झापाचीवाडी इत्यादी १६ महसुली गावे व वाडयावस्त्या येत असून या आरोग्य केंद्रात दोन वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे मागील काही महिन्यापासून रिक्त असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने रिक्त पदे भरण्याकडे दुर्लक्ष करणाऱ्या संबधित दोषींवर कोणती कारवाई केली तसेच रिक्त पदे त्वरीत भरण्याबाबत काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
येथे आरोग्य सेवा देण्यासाठी एन.एच.एम. अंतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांची सेवा उपलब्ध करण्यात आली आहे.
(२) रिक्त पदे भरण्यासाठी जिल्हास्तरावर तसेच राज्यस्तरावर कार्यवाही सुरु आहे. तसेच बंधपत्रीत वैद्यकीय अधिकारी उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. त्यामुळे रिक्त पदे भरण्याकडे दुर्लक्ष झालेले नाही. त्यामुळे कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मोखाडा (जि.पालघर) तालुक्यातील पालघर-वाडा-देवगाव रस्त्याची दुरवस्था झाल्याबाबत

**(३५) ३६९१० (२७-११-२०१७). श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मोखाडा (जि.पालघर) तालुक्यातील पालघर-वाडा-देवगाव रस्त्यावरील आमले घाटात दरड कोसळून राज्य मार्ग खचला असल्याचे दिनांक २० सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रस्त्याची दुरूस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) अमले घाटात कि.मी. ७८/५०० मध्ये कोसळलेली दरड काढून टाकून खचलेल्या रस्त्याच्या कडेला गॉबियन वॉल बांधण्याचे काम माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये पूर्ण झाले आहे. सद्य:स्थितीत रस्त्यावरील वाहतुक सुरळीत सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी येथील शिक्षण विभागात झालेल्या गैरप्रकारांबाबत

**(३६) ३६९३१ (२३-११-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्हयातील शिक्षकांच्या बदल्या व इतर प्रकरणी मुख्य कार्यकारी अधिकारी व शिक्षणाधिकारी यांनी केलेल्या गैरप्रकारांची चौकशी करण्याबाबत शिक्षक संघटना नेते श्री स. र. काद्री यांनी केलेल्या तक्रारीवरून विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना चौकशी करून अहवाल सादर करण्याचे आदेश सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी चौकशी करून अहवाल शासनाकडे सादर केला आहे काय,
(३) असल्यास, अहवालात काय आढळून आले, त्यानुषंगाने दोषींवर काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०८-१२-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी प्राथमिक चौकशी अहवाल शासनाकडे सादर केला आहे.
(३) दिनांक १०/४/२०१७ च्या जिल्हास्तरीय बैठकीत निलंबित शिक्षकांना सेवेत पुर्नस्थापित करण्यासंबंधी भेदाभेद करणे तसेच निलंबन आढावा बैठकीत समितीसमोर सर्व प्रकरणे तपशिलासह ठेवण्याची जबाबदारी शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, परभणी यांनी पार पाडली नसल्यामुळे याबाबत त्यांचेकडून विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी खुलासा मागविला असून, खुलासा प्राप्त होताच पुढील कारवाई प्रस्तावित करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी जिल्हयातील स्वच्छता गृह व इतर योजनांमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(३७) ३६९३२ (२०-११-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्हयातील जिल्हा परिषदेद्वारे उभारण्यात आलेल्या स्वच्छता गृह व इतर योजनांमध्ये कोटयवधी रुपयांचा गैरप्रकार करणाऱ्या दोषी गायकवाड यांच्याविरुध्द कारवाई करण्यात यावी अशी मागणी ॲड. माधुरी क्षिरसागर व इतर सामाजिक कार्यकर्त्यांनी सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांच्याकडे लेखी निवेदनाव्दारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार संबंधित अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, या प्रकरणात ज्या दोन संस्थाना स्वच्छता गृह व इतर निधी दिला गेला. त्या अनुषंगाने संबंधित अधिकाऱ्यांची प्राथमिक चौकशी करण्यात आली असून त्यांच्याकडून खुलासा मागविला आहे. खुलासा प्राप्त होताच पुढील कार्यवाही करण्यात येईल.

वरील दोन्ही संस्थात ग्रामसेवक श्री.गायकवाड यांचे नातेवाईक सभासद असल्याचे दिसून आले आहे. मात्र कोणताही दबाव आणून कोऱ्या चेक वर सह्या घेतल्या नसल्याचा सरपंचानी जबाव दिला आहे. याच ग्रामसेवकांनी सन १९९९ ते २०१० पर्यंत केलेल्या कामाची चौकशी सुरु आहे. चौकशी अंती आवश्यक ती कारवाई करण्यात येईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी शहरात जैव वैद्यकिय घनकचरा व्यवस्थापन विल्हेवाट केंद्र उभारण्याबाबत

**(३८) ३६९३८ (२८-११-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी शहरातील जैव वैद्यकिय घनकचरा व्यवस्थापन विल्हेवाट केंद्र उभारणीबाबत जागेची उपलब्धता नसल्यासंदर्भात जिल्हा शल्य चिकित्सक, परभणी यांनी जिल्हाधिकारी, परभणी यांना जिल्हा पर्यावरण समितीच्या बैठकीत स्पष्ट केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्राथमिक आरोग्य केंद्रातील जैव वैद्यकिय घनकचरा सुयोग्यरितीने विल्हेवाट लावण्याऐवजी खड्ड्यात पुरून त्याचे विघटन करण्यात येत असल्याने सर्व प्राथमिक आरोग्य केंद्राना नोटीस देण्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी यांनी माहे जुलै, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हा पर्यावरण समितीच्या बैठकीत आदेशित केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त बाब नागरिकांच्या आरोग्याशी निगडीत असल्याने शासनाने या प्रकरणी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे आहे.
(३) परभणी जिल्हा परिषदेच्या ३१ प्रा.आ. केंद्रामधील जैव वैद्यकीय घनकचरा विल्हेवाट व्यवस्थापनासाठी (Common Treatment Facility) संस्था निश्चित करुन यांच्यासोबत दिनांक ३१/१०/२०१७ पासून करार करण्यात आला आहे. सदर एजन्सीद्वारे जैव वैद्यकीय घन कचऱ्याची विल्हेवाट लावण्यात येते.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबई-पुणे द्रुतगती महामार्गावरील फूड मॉल, पेट्रोल पंप भूखंड वाटपात गैरव्यवहार झाल्याबाबत**

**(३९) ३६९४५ (२७-११-२०१७). श्री.अनिल भोसले : तारांकित प्रश्न क्रमांक ३०९१४ ला दिनांक २४ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई-पुणे द्रुतगती महामार्गावर पेट्रोल पंप आणि फूड मॉलसाठी देण्यात आलेल्या भूखंड वाटपात गैरव्यवहार होऊन शासनाने रूपये २००० कोटींचे नुकसान झाल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने गैरव्यवहातील दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१२-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**हवेली (जि.पुणे) तालुक्यातील शासकीय जमिनीवरील अतिक्रमणे रोखण्याबाबत**

**(४०) ३६९५२ (२३-११-२०१७). श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३२३७१ ला दिनांक ३१ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) फुरसुंगी, भेकराईनगर, गंगानगर, ऊरुळी देवाची, वडकी, कोंढवा (ता.पूर्व हवेली, जि.पुणे) या गावांमधील शासकीय गायरान व शासकीय जागांवर मोठ्या प्रमाणात अतिक्रमण करण्यात आल्याचे तसेच, सदर गावांमध्ये डोंगर व टेकडयांचे सपाटीकरण करुन पर्यावरणाचा ऱ्हास येथील भूमाफिया करीत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शासकीय जमिनीवर अतिक्रमण करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-१२-२०१७) :** (१) मौजे फुरसुंगी (भेकराई नगर, गंगानगर), ऊरळी देवाची, वडकी येथील सरकारी गायरान व शासकीय जमिनीवर काही प्रमाणात अतिक्रमणे झाली आहेत. तसेच, मौजे उरळी देवाची व कोंढवा या गावामध्ये डोंगर व टेकड्यांचे सपाटीकरण करुन पर्यावरणाचा ऱ्हास केल्याबाबत एकूण ८ प्रकरणे प्राप्त झाली आहेत.

(२) उक्त ठिकाणावरील बहुतांश अतिक्रमणे गायरान जमिनीवरील असल्याने शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक १२/०७/२०११ नुसार गायरान जमिनीवरील अतिक्रमणे नियमानुकुल करता येत नाहीत.

मौजे उरळी देवाची व कोंढवा येथील डोंगर व टेकड्यांच्या सपाटीकरणाच्या ८ प्रकरणांपैकी ५ प्रकरणांमध्ये पाच पट रक्कम रुपये १,२४,२५,१२९/- इतका दंड आकारण्यात आलेला आहे. या संदर्भात वसूलीची कार्यवाही सुरु आहे. उर्वरित ३ प्रकरणे सुनावणीवर प्रलंबित आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे वाणगांव (ता.डहाणू, जि.पालघर) येथील गावठाण भूमापन मोजणी पूर्ण करुन नगर भूमापन लागू करणेबाबत

**(४१) ३६९९६ (२७-११-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे वाणगांव (ता.डहाणू, जि.पालघर) येथील गावठाण भुमापन मोजणीचे काम उपअधिक्षक भूमी अभिलेख, डहाणू या कार्यालयाकडून सन १९९५ साली सुरु करण्यात आलेले काम सद्य:स्थितीत अपूर्णवस्थेत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू भूमापन मोजणीचे काम अर्धवट स्थितीत ठेवण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने वाणगांव येथील गावठाण भूमापन मोजणी पूर्ण करुन नगर भूमापन लागू करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-१२-२०१७) :** (१), (२), (३) व (४) सन १९९३-९४ मध्ये मौजे वाणगांव, ता.डहाणू, जि.पालघर येथील भूमापन करावयाच्या मिळकतींची एकूण संख्या ५१०८ अशी होती. तथापि मुंबई-अहमदाबाद महामार्गाचे भूसंपादन संयुक्त मोजणीचे काम व अशा अन्य प्राथम्य कामांमुळे सदर भूमापनाचे काम पूर्ण करणे शक्य झाले नसून आतापर्यंत १०९२ मिळकतींच्या भूमापनाचे काम पूर्ण झाले आहे.

मौजे वाणगांव, ता.डहाणू, जि.पालघर येथील विचाराधीन भूमापन गावठाणाची जागा ही, रेल्वे स्टेशन लगत असून २००२ पासून सदर जागेवर बांधकामे व अनेक विकासकामे झाल्याने तेथील मिळकतींच्या संख्येत लक्षणीय वाढ झालेली आहे. उपअधिक्षक भूमि अभिलेख, डहाणू कार्यालयातील उपलब्ध कर्मचाऱ्यांकडून हे काम पूर्ण करण्यास आणखी बराच कालावधी लागणे अपेक्षित असल्याने उपसंचालक भूमि अभिलेख कोकण प्रदेश, मुंबई यांना त्यांच्या अधिपत्याखालील काही कर्मचाऱ्यांच्या सेवा अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करुन देऊन हे काम लवकर पूर्ण करण्याबाबत कळविण्यात आले आहे.

---

**उमरखेड (जि.यवतमाळ) तालुक्यातील अवैध प्रवासी वाहतुक रोखण्याबाबत**

**(४२) ३७०२७ (२२-११-२०१७). श्री.मोहनराव कदम, श्री.हरिसिंग राठोड, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उमरखेड (जि.यवतमाळ) तालुक्यात मोठ्या प्रमाणात अवैध वाहतुक होत असल्यामुळे अपघाताच्या संख्येत वाढ होत असून जिवित व वित्त हानी झाल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रवासी वाहतुकदार येथील पोलीस विभागाच्या सहकार्याने अवैध वाहतुक करीत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करून अवैध प्रवासी वाहतुक रोखण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१८-१२-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.

(३) यवतमाळ जिल्ह्यातील अवैध प्रवासी वाहतूक करणाऱ्या वाहनांवर उप प्रादेशिक परिवहन कार्यालय यांच्या वायुवेग पथकाद्वारे वाहनांची नियमित तपासणी करण्यात येते. एप्रिल, २०१७ ते नोव्हेंबर, २०१७ या कालावधीत ६३९ दोषी वाहनांवर कार्यवाही करण्यात येवून रुपये ५२.८३ लाख एवढी दंडात्मक कारवाई करण्यात आलेली आहे. तसेच २९४ वाहनांच्या नोंदणी निलंबनाची कारवाई करण्यात आलेली आहे.

तसेच, पोलीस विभागाकडून सन २०१६ ते नोव्हेंबर, २०१७ पर्यंत ११७३ अवैध प्रवासी वाहतूक करणाऱ्या वाहनांवर कारवाई करण्यात आलेली आहे. अवैध वाहतुकीविरुध्द कारवाई करण्याकरीता पोलीस विभाग, राज्य परिवहन महामंडळ व परिवहन विभाग यांच्या संयुक्त पथकाव्दारे संयुक्त कारवाई करण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील किल्ल्यामध्ये पर्यटकांसाठी जागतिक दर्जाची निवास व्यवस्था करण्याबाबत

**(४३) ३७०६८ (२३-११-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात पर्यटकांना प्रत्यक्ष किल्ल्यामध्ये राहून तेथील इतिहास, संस्कृती आणि स्थापत्याची माहिती आणि आनंद घेता यावा, यासाठी २०० किल्ल्यांमध्ये पर्यटकांसाठी जागतिक दर्जाची निवास व्यवस्था उभी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (११-१२-२०१७) :** (१) नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## केंद्र शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या ट्रॉमा केअर सेंटरबाबत

**(४४) ३७१७८ (२७-११-२०१७). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या ट्रॉमा केअर सेंटर क्षमतावृध्दी योजनेंतर्गत राज्यातील ट्रॉमा केअर-सेंटर्स स्थापनेचे नियोजन सदोष असून अपुऱ्या मुलभूत सुविधा, अप्रशिक्षित परिचिकित्सा व चिकित्सा कर्मचारी व परिचारिका इ. मुळे राज्यातील १७ केंद्रे पूर्ण निष्क्रीय राहिल्याचे महालेखापरिक्षक व नियंत्रकाच्या अहवालात नमूद करण्यात आले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील अपघातग्रस्तांना वेळेवर ट्रॉमा केअर सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता राज्य शासनाने कर्मचारी व साधनसामग्रीची बाब निकाली काढावी असे कॅगने सूचना दिली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त सूचनेच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (११-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) महालेखापाल यांनी दिनांक १२/०८/२०१६ रोजीच्या पत्रान्वये १८ ट्रामाकेअर सेंटरचा लेखापरिक्षण अहवाल सादर केला. सदर अहवालामध्ये नमूद केलेल्या १७ ट्रामाकेअर युनिट पैकी १४ ट्रामा केअरचे बांधकाम पूर्ण झाले असून ३ चे बांधकाम प्रगतीपथावर आहे. सदर १४ ट्रामाकेअर सेंटरसाठी यंत्रसामुग्री व उपकरणे पुरविण्यात आली आहे. एकूण १७ ट्रामाकेअर सेंटरसाठी आवश्यक पदनिर्मिती करण्यात आली आहे व १५ सेंटर वर पदभरती करण्यात आली आहे. ह्या ट्रामाकेअर सेंटर्स मध्ये एकूण २,५०,११४ (बाह्यरुग्ण) व २२,३८१ (आंतररुग्ण) यांना सेवा पुरविण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेत रोजगाराच्या प्रमाणात घट झाल्याबाबत

**(४५) ३७१७९ (२७-११-२०१७). डॉ.सुधीर तांबे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेत गेल्यावर्षीच्या तुलनेत प्रति कुटूंब सरासरी रोजगाराच्या प्रमाणात घट झाली असल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१५-१६ मध्ये सरासरी प्रति कुटूंब मनुष्य दिवस निर्मिती ६० होती ती सन २०१६-१७ मध्ये ४९ दिवसांपर्यंत खाली आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने ग्रामीण भागातील मजूरांना या योजनेंतर्गत अधिकाधिक कामे उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०८-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) सदर योजना मागणी प्रधान योजना आहे. ग्रामपंचायत/ यंत्रणास्तरावर शेल्फ ठेवण्यात येतो व मागणी प्रमाणे मजुरांना कामे उपलब्ध करून देण्यात येतात.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अहमदनगर जिल्हा परिषदेच्या शाळांमधील वर्गखोल्याची पडझड होवून त्या धोकादायक झाल्या असल्याबाबत

**(४६) ३७१८२ (२७-११-२०१७). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.आनंदराव पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अहमदनगर जिल्हा परिषदेच्या अनेक प्राथमिक शाळांचे वर्ग उघडयावर, झाडाखाली व चावडीत भरत असून अनेक शाळांमधील वर्गखोल्याची पडझड होवून त्या धोकादायक झाल्या असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर शाळांच्या इमारतीचे स्ट्रक्चरल ऑडीट केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने धोकादायक इमारतींची दुरुस्ती व त्यासाठी लागणाऱ्या निधीची तरतूद करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) याबाबतची कार्यवाही सुरु आहे.

(३) अहमदनगर जिल्हा परिषदेच्या सर्व प्राथमिक शाळांचा इमारतीची तांत्रीक तासणी करण्यात आली आहे. जिल्हयात एकूण १४८७६ वर्ग खोल्या असून त्यापैकी ७५७० वर्ग खोल्या सुस्थितीत आहेत.

* सर्व शिक्षा अभियानांतर्गत १४२९ वर्ग खोल्यांचे बांधकाम करण्यात आले आहेत.
* जिल्हा परिषद शाळांच्या ४५७७ वर्ग खोल्यांची दुरुस्ती व शिक्षक संख्येच्या प्रमाणात नवीन १३०० वर्ग खोल्यांचे बांधकामाबाबतची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**टोल ते नांदवी (ता.महाड, जि.रत्नागिरी) येथील रस्त्याची दुरवस्था झाल्याबाबत**

**(४७) ३७३६९ (२७-११-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदवी (ता.महाड, जि.रत्नागिरी) येथे माध्यमिक व महाविद्यालयात शिक्षण घेण्यासाठी जाणाऱ्या विद्यार्थ्यांना ये-जा करण्यासाठी खाजगी वाहनांचा किंवा एसटी सेवेचा आधार असून टोल ते नांदवी या रस्त्याची दुरवस्था झाल्याने सद्या या मार्गावरील खाजगी वाहने तसेच महाड आगारातील एसटी गाड्यांची सेवा रस्त्यांच्या दुरवस्थेमुळे बंद केल्याने विद्यार्थ्यांना शिक्षण घेण्यासाठी ६ किमीचा प्रवास पायपीट करावा लागत असल्याचे दिनांक २६ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रस्त्यांची दुरूस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-१२-२०१७) :** (१) अंशत खरे आहे.
(२) रायगड जिल्ह्यातील माणगाव तालुक्यातील नांदवी ते टोळ मार्ग हा इतर जिल्हा मार्ग क्र. १३३ असून रस्त्याची एकूण लांबी ६.०० कि.मी. आहे. त्यापैकी ०/०० ते ५/०० कि.मी. ही लांबी माणगांव तालुक्यात येत असून ५/०० ते ६/०० कि.मी. लांबी महाड तालुक्यात येते. सदर रस्त्यावर मोठ्या प्रमाणात अवजड वाहनांची वाहतुक होत असल्याने रस्त्याचा पृष्ठभाग खराब झाला आहे. सद्य:स्थितीत तात्पुरत्या स्वरुपाची दुरुस्ती करण्यात आली असून या मार्गावर एस.टी.वाहतूक सुरु आहे.

सदर रस्त्याच्या कामाचा प्रस्ताव ५०५४ लेखाशिर्षकांतर्गत जिल्हा नियोजन समितीकडे जिल्हा परिषदेमार्फत पाठविण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अक्कलकोट (जि.सोलापूर) बसस्थानकाची दुरवस्था झाल्याबाबत

**(४८) ३७४५२ (२२-११-२०१७). श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अक्कलकोट (जि.सोलापूर) बसस्थानकाची दुरवस्था झाल्यामुळे सदर तीर्थक्षेत्र ठिकाणी येणाऱ्या भाविक प्रवाश्यांना त्रास सहन करावा लागत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदरहू बसस्थानकांची दुरुस्ती व देखभाल करुन सदर कामाकडे दुर्लक्ष करणाऱ्या संबंधित दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०८-१२-२०१७) :** (१) व (२) अक्कलकोट बसस्थानकामध्ये पाण्याची गळती होत होती. सदर दुरुस्ती करण्यात येऊन होणारी गळती पूर्णपणे बंद करण्यात आली असून, नियमित देखभालीच्या अंतर्गत बसस्थानक दुरुस्ती व रंग कामाला मंजूरी घेवून कामाच्या निविदा मागविणेत आलेल्या आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**महूद (ता.सांगोला, जि.सोलापूर) परिसरातील रस्त्यांची दुरवस्था झाल्याबाबत**
**(४९) ३७४५५ (२७-११-२०१७). श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महूद (ता.सांगोला, जि.सोलापूर) परिसरातील सर्वच रस्त्यांची दुरवस्था झाली असल्यामुळे मोठ्या प्रमाणात वाहतुक कोंडी होत असल्याने प्रवासी व वाहनचालकांना अतिशय त्रास सहन करावा लागत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदरहू रस्त्यांची दुरुस्ती करण्याबाबत तसेच रस्त्यांच्या दुरुस्तीकडे दुर्लक्ष करणाऱ्या संबंधित दोषीवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहेत,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?
**श्री.चंद्रकांत पाटील (०६-१२-२०१७) :** (१) होय.

महूद ता.सांगोला परिसरातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील रस्त्यांच्या लांबीपैकी काही लांबीतील रस्ते क्षतिग्रस्त झाले होते. तथापि रस्त्यावरुन वाहतूक सुरु होती.
(२) व (३) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील रस्त्यांच्या लांबीपैकी ३२.३०० कि.मी. क्षतिग्रस्त लांबीमधील रस्त्याची दुरुस्ती करण्याची कामे मंजूर आहेत. आता कामे प्रगतीपथावर असून रस्त्यांच्या डांबरी पृष्ठभागावरील खड्डे भरण्याचे काम प्रगतीत असून ते १५ डिसेंबर, २०१७ अखेर पूर्ण करण्याचे नियोजन आहे.

सद्य:स्थितीत सर्व रस्त्यांवरुन वाहतूक सुरळीत सुरु आहे.

---

## चौधरवाडी (पो.सर्कलवाडी)(ता.कोरेगांव, जि.सातारा) फाटा ते गावात जाण्याकरिता असलेल्या रस्त्यांची दुरवस्था झाल्याबाबत

**(५०) ३७४५९ (२९-११-२०१७). श्री.परिणय फुके** : सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चौधरवाडी (पो.सर्कलवाडी)(ता.कोरेगांव, जि.सातारा) फाटा ते गावात जाण्याकरिता हनुमान मंदिरापर्यंत तसेच गावातील अंतर्गत रस्त्यांची दुरवस्था झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे स्थानिकांची मोठ्या प्रमाणात गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-१२-२०१७)** : (१) व (२) होय, हे खरे आहे.

(३) प्रश्नांकित रस्त्यांची पाहणी जिल्हा परिषदेमार्फत करण्यात आली आहे. चौधरीवाडी जोडरस्ता हा ग्रामीण मार्ग क्र. १७ असून या रस्त्याची लांबी १.२०० कि.मी. आहे. सदर रस्त्याची दुरुस्ती करणे आवश्यक आहे. जिल्हा परिषदेला विविध योजनांमधून प्राप्त निधी व निकषाच्या अधिन राहून प्राथम्यक्रमानुसार सदर रस्त्याचे काम प्रस्तावित करण्याचे जिल्हा परिषदेचे प्रयत्न आहेत.

चौधरवाडी ग्रामपंचायत अंतर्गत रस्त्यांची लांबी २.५ ते ३.०० कि.मी. असून निधीच्या उपलब्धतेनुसार रस्त्यांची कामे टप्प्या-टप्प्याने करण्याचे ग्रामपंचायतीचे प्रयत्न आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**मुंबई.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, मुंबई.